**अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), नवी मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. सीओएन २०२२/प्र.क्र.२५/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २६ एप्रिल, २०२२

<u>संदर्भ</u> : १) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. सीओएन-२०२१/प्र.क्र.७४/प्रशासन-१ दि. १२ ऑक्टोबर, २०२१.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२२ फेब्रुवारी, २०२२.
३) अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), नवी मुंबई यांची दि.१४ मार्च, २०२२ व दि.०८ एप्रिल, २०२२ रोजीची पत्रे.

**शासन निर्णय -:**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), नवी मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अस्थायी पदे दि. ०१ सप्टेंबर, २०२१ ते दि.२८ फेब्रुवारी, २०२२ पर्यंत चालू ठेवण्यात आली होती.

**२.** आता या शासन निर्णयान्वये अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), नवी मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील नियमित अस्थायी आस्थापनेवरील ३६ पदे सोबत दर्शविलेल्या विवरणपत्रानुसार सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त नाहीत, या अटीच्या अधीन राहून **दिनांक ०१ मार्च, २०२२ पासून दिनांक ३१ ऑगस्ट, २०२२ पर्यंत** चालू ठेवण्यास शासन मंजूरी देत आहे.

**३.** दि. २५ नोव्हेंबर, २००४ च्या शासन निर्णयान्वये सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत स्थापत्य शाखेतील क्षेत्रिय स्तरावरील नियमित संवर्गापैकी ३४ संवर्गातील पदांचा आणि दि. १० डिसेंबर, २००४ च्या शासन निर्णयान्वये अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती) या कार्यालयातील पदांचा आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. सदर या शासन निर्णयातील तरतूदी/सूचनांचे पालन करण्यात यावे.

**४.** या बाबीवरील अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), नवी मुंबई यांच्या कार्यालयातील पदांच्या वेतनाचा खर्च " २०५९ - सार्वजनिक बांधकामे ८० - सर्वसाधारण, ००१ - संचालन व प्रशासन (चार) पर्यवेक्षण (योजनेतर) व विभाग / उपविभागांतर्गत पदांसाठी २०५९ - सार्वजनिक बांधकामे, ८० - सर्वसाधारण - ००१ - संचालन व प्रशासन (पाच) कार्यान्वयन (योजनेतर) " या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

तसेच अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), कोकण भवन, नवी मुंबई यांच्या कार्यालयातील एक शिपाई पदासाठी वेतनावरील खर्च " ३०५१ बंदरे व दिपगृहे ०२,लहान बंदरे १०२, बंदर व्यवस्थापन (०१), वेतन (०३), प्रवास खर्च (०५), कार्यालयीन खर्च मागणी क्र.४ या लेखाशीर्षाखाली असून, उर्वरित अस्थायी पदांकरिता २०५९ सा.बां. ८० सर्वसाधारण ००१ संचालन व प्रशासन दोन संकल्पचित्र (०१) वेतन (०३), प्रवास खर्च (०५), कार्यालयीन खर्च (योजनेतर) " मागणी क्र. एच-६ संगणक क्र. २०५९०६२३ लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**५.** वित्त विभाग, शासन निर्णय क्र.: पदनि २०१६/ प्र.क्र.८/ १६/ आ.पु.क. दि. २२ फेब्रुवारी, २०२२ या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४२६१२४६४३३२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=23b2f1b1fd914a87080cb68712db5efd17f65e69284fe1d3274a32de69eb6a25, serialNumber=10d36944a4b86eab516b1b70183709c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2022.04.26 12:48:04 +05'30'

**( वि. नि. ढमाळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-** १) महालेखापाल-१ (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) महालेखापाल-२ (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), कोकण भवन, नवी मुबंई.
४) जिल्हा कोषागार / उप कोषागार अधिकारी, नवी मुबंई / पुणे / नाशिक /औरंगाबाद / नागपूर.
५) वित्त विभाग (व्यय-११) / (आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी, सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कार्यासन प्रशासन-१, (निवडनस्ती).

विवरणपत्र (१) नियमित अस्थायी आस्थापनेवरील पदे (३४ संवर्गाच्या आतील)

| अ. क्र. | कार्यालयाचे नाव | दि.२८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांची संख्या. | दि.२८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांमध्ये झालेली वाढ. | दि.२८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांमध्ये झालेली घट | दि.०१/०३/२०२२ पासून दि.३१/०८/२०२२ पर्यंत मुदतवाढ द्यावयाच्या पदांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), नवी मुंबई | ३१ | ०७ | ०२ | ३६ |
| | **एकूण** | **३१** | **०७** | **०२** | **३६** |